**श्री.के.एच.गोविंदराज,भा.प्र.से. यांच्या व्यवस्थापकीय संचालक, सिकॉम लि., मुंबई या पदावरील प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती विहित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- नियुक्ती-२०१७/प्र.क्र. १२२/उद्योग-८**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - ०४ ऑगस्ट, २०१७.

<u>वाचा:-</u> १) सामान्य प्रशासन विभाग, अ.शा.पत्र क्र. एईओ-१११७/१०/२०१७/१०, दि. २१/०४/२०१७

**शासन निर्णय-**

श्री. के. एच. गोविंदराज, भारतीय प्रशासकीय सेवा यांची संदर्भ (१) वरील अर्धशासकीय पत्रातील आदेशान्वये व्यवस्थापकीय संचालक, सिकॉम लि., मुंबई या पदावर प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात आली आहे. त्या अनुषंगाने शासन असे आदेश देत आहे की, श्री. के. एच. गोविंदराज भा.प्र.से. यांच्या व्यवस्थापकीय संचालक, सिकॉम लि., या पदावरील प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी/ शर्ती पुढीलप्रमाणे विहित करण्यात येत आहेत.

१) **<u>प्रतिनियुक्तीचा कालावधी-</u>** श्री. के. एच. गोविंदराज, भारतीय प्रशासकीय सेवा हे दि. २७/०४/२०१७ (म.पु.) पासून पुढील आदेश होईपर्यंत स्वीयेत्तर सेवेत प्रतिनियुक्तीवर असतील मात्र,

अ) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनास आवश्यक वाटली तर त्यांना त्यांच्या प्रतिनियुक्तीचा कालावधी पूर्ण होण्यापूर्वी स्वीयेत्तर सेवेतून केव्हाही परत बोलावण्याचा हक्क शासनास असेल.

ब) त्यांच्या सेवेची आवश्यकता सिकॉम लि. या संस्थेस नसेल तर ते त्यांना शासन सेवेत परत पाठवू शकतात. मात्र, ज्या दिनांकापासून तसे करावयाचे असेल त्याच्या कमीत कमी ३ महिने अगोदर तसे शासनास कळविणे आवश्यक राहील.

(२) **<u>वेतन-</u>** श्री. के. एच. गोविंदराज (भा.प्र.से.) हे सदर प्रतिनियुक्तीच्या कालावधीत व्यवस्थापकीस संचालक हे पद धारण करतील. सदर कालावधीत ते भारतीय प्रशासन सेवेतील वेतन मॅट्रीक्स स्तर क्र.१४ मध्ये ( रू. १,४४,२००-रु.२,१८,२००) वेतन घेतील. त्यांच्या वार्षिक वेतन वाढी मंजूर करण्याबाबतचे आदेश शासनाच्या सामान्य प्रशासन विभागाकडून (का.९-अ) निर्गमित करण्यात येतील.

(३) **<u>प्रतिनियुक्ती भत्ता :</u>** श्री. के. एच. गोविंदराज (भा.प्र.से.) यांना प्रतिनियुक्तीच्या सदर कालावधीत प्रतिनियुक्ती भत्त्याबाबत शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. भाप्रसे-३०१३/३१२/९ , दि. ११/९/२०१३ मधील तरतूदी लागू राहतील. त्यानुसार अनुज्ञेय प्रतिनियुक्ती भत्ता सिकॉम लि. ही संस्था देईल.

(४) **<u>महागाई भत्ता</u>-** श्री. के. एच. गोविंदराज (भा.प्र.से.) यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत अखिल भारतीय सेवा अधिका-यांना वेळोवेळी ज्या दराने महागाई भत्ता अनुज्ञेय असेल त्या दराने महागाईभत्ता अनुज्ञेय असेल.

(५) **स्थानिक पुरक भत्ता –** श्री. के. एच. गोविंदराज (भा.प्र.से.) यांना राज्य शासनाच्या नियमांनुसार/आदेशानुसार वेळोवेळी अनुज्ञेय असेल त्या दराने स्थानिक पूरक भत्ता अनुज्ञेय असेल.

(६) **निवासस्थान किंवा त्याऐवजी घरभाडे भत्ता**- श्री. के. एच. गोविंदराज (भा.प्र.से.) यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्यांच्या दर्जास साजेसे निवासस्थान व्यवस्थापकीय संचालक, सिकॉम लि., मुंबई ही संस्था देईल. तथापि, ती संस्था त्यांना योग्य असे निवासस्थान देऊ शकत नसेल आणि त्यांच्या ताब्यात प्रतिनियुक्तीवर जाण्यापूर्वी शासकीय निवासस्थान असेल तरच ते शासकीय निवासस्थान प्रतिनियुक्तीच्या कालावधीत आपल्या ताब्यात ठेवू शकतात. मात्र, प्रतिनियुक्तीवर गेल्याच्या दिनांकापासून पहिले ३ महिने त्यांना विहीत सामान्य दराने व त्यानंतर आर्थिक दराने शासकीय निवासस्थानाचे अनुज्ञप्ती शुल्क व सेवाशुल्क भरणे आवश्यक आहे सिकॉम लि. या संस्थेच्या नियमानूसार त्यांना भाडेरहीत तत्वावर निवास स्थान देय असेल तर त्याचा लाभ श्री. के. एच. गोविंदराज (भा.प्र.से.) यांना घेता येईल.

प्रतिनियुक्तीच्या सदर कालावधीत त्यांच्या ताब्यात शासकीय किंवा सिकॉम संस्था यांचे निवासस्थान नसेल तर त्यांना शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक भाप्रसे १००८/प्र.क्र. २६२/०८/९, दिनांक २५/२/२०१० नुसार तसेच त्यामध्ये वेळोवेळी केलेल्या बदलानुसार अनुज्ञेय असलेला घरभाडे भत्ता अनुज्ञेय असेल.

(७) **पदग्रहण अवधी वेतन आणि बदली प्रवास भत्ता**- श्री. के. एच. गोविंदराज (भा.प्र.से.) यांना त्यांची स्वीयेत्तर सेवेत बदली झाल्यानंतर आणि तेथून परत आल्यानंतर, अशा दोन्ही वेळच्या पदग्रहण अवधीमध्ये त्यांचे वेतन व प्रवास भत्ता, तो अधिकारी ज्या शासनाच्या सेवेत असताना स्वीयेत्तर सेवेत गेला असेल ते शासन किंवा स्वियेत्तर सेवेत परत आल्यानंतर ज्या शासनाच्या सेवेत जाणार असेल ते शासन यांच्या संबंधित नियमानुसार सिकॉम लि. ही संस्था देईल. ,

(८) **प्रतिनियुक्तीच्या कालावधीत कर्तव्यार्थ केलेल्या प्रवासाकरीता प्रवासभत्ता**- श्री. के. एच. गोविंदराज (भा.प्र.से.) यांना स्वियेत्तर सेवेत रुजू झाल्यानंतर कर्तव्यार्थ कराव्या लागणा-या प्रवासाकरीता राज्य शासनाच्या संबंधित नियमांन्वये किंवा या संस्थेच्या नियमान्वये यापैकी ज्यांचे नियम अधिक फायदेशिर असतील त्या नियमानुसार प्रवास भत्ता आणि दैनिक भत्ता अनुज्ञेय असेल.

(९) **रजा**- श्री. के. एच. गोविंदराज (भा.प्र.से.) यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत अखिल भारतीय सेवा (रजा) नियम,१९५५ हे नियम लागू असतील व प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्यांना नैमित्तिक रजेव्यतिरिक्त इतर प्रकारची रजा मंजूर करण्यास शासन ( सामान्य प्रशासन विभाग/कार्या-१०) सक्षम असेल. स्वियेत्तर सेवेच्या कालावधीत अथवा सेवानिवृत्तीच्या वेळेस घेतलेल्या रजेच्या कालावधीबद्दल द्यावयाच्या रजावेतनाचा व कोणत्याही स्थानिक पुरक भत्यावरील संपूर्ण खर्च, सिकॉम लि. यांना सोसावा लागेल.

(१०) **विकलांगता रजा वेतन**- स्वियेत्तर सेवेत किंवा अशा सेवेमुळे आलेल्या विकलांगतेबद्दल मंजूर करण्यात येणा-या रजेच्या संबंधात, अशी विकलांगता स्वीयेत्तर सेवा संपल्यानंतर उघडकीस आली तरी सुध्दा रजा वेतन देण्यास सिकॉम लि. ही संस्था जबाबदार असेल. अशा रजा वेतनाचा खर्च त्या संस्थेकडून वसूल करण्यात येईल.

(११) **रजा वेतन व निवृत्ती वेतन अंशदाने**:- श्री. के. एच. गोविंदराज (भा.प्र.से.) यांच्याबाबत रजा वेतन व निवृत्तीवेतन अंशदान हे साप्रवि शासन परिपत्रक क्र. भाप्रसे १४१३/ प्र.क्र.२२०/२०१३/९- अ दिनांक १२/२/२०१४ मध्ये नमूद मार्गदर्शक सूचनांनुसार सिकॉम लि. शासनाकडे (सामान्य प्रशासन विभाग/का. ९ अ) प्रत्येक आर्थिक वर्षाच्या समाप्तीपासून १५ दिवसांच्या आत किंवा जर स्वीयेत्तर सेवा आर्थिक वर्ष संपण्यापूर्वी समाप्त झाली असेल तर स्वीयेत्तर सेवा समाप्तीनंतर भरणा करील. ह्या रकमा दोन वेगवेगळ्या डिमांड ड्राफ्टव्दारे (पहिला रजा वेतनाच्या रकमेचा व दुसरा निवृत्ती अंशदानाच्या रकमेचा) सहायक संचालक, सामान्य प्रशासन विभाग/ का. ९ अ, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ यांच्याकडे पाठविणे आवश्यक आहे. सदर डिमांड ड्राफ्ट/धनादेश सहायक संचालक (लेखा), साप्रवि/९-अ, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२ यांचे नांवे काढलेले असणे आवश्यक आहे. सदर रकमा पुढील लेखाशीर्षाखाली जमा दर्शविण्यात याव्यात.

(अ) रजा वेतन :- ००७०- इतर प्रशासकीय सेवा- ६० इतर सेवा- ६०- इतर सेवा- ८००- इतर जमा रकमा (नऊ) अखिल भारतीय सेवेतील जे अधिकारी स्वीयेतर सेवेत प्रतिनियुक्तीवर आहेत, त्यांच्याबाबत रजा वेतन अंशदान (००७००११६)

(ब) निवृत्तीवेतन अंशदान:- ००७१- निवृत्तीवेतन व इतर सेवा- निवृत्ती लाभ त्यांच्या वसूली सबंधातील अंशदाने व वसुलीच्या रकमा- ०१- नागरी-१०१-लाभदाने व अंशदाने (एक) स्वीयेत्तर सेवा अधिकारी (००७१ ००१२)

**टीप :-** प्रतिनियुक्तीच्या कालावधीत उपरोक्त रकमांचा भरणा करण्यास विलंब झाल्यास सिकॉम लि. विलंब कालावधीत दंडात्मक व्याज भरण्यास जबाबदार राहील.

(१२) **नैमित्तिक रजा** :- श्री. के. एच. गोविंदराज (भा.प्र.से.) यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत राज्य शासनाच्या नियमानुसारच नैमित्तिक रजा उपभोगता येईल. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत नैमित्तिक रजा मंजूर करण्यास, संस्थेच्या कार्यकारी प्रमुखास दुय्यम असलेल्या अधिका-यांना संस्थेचे कार्यकारी प्रमुख व संस्थेच्या कार्यकारी प्रमुखास संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभाग सक्षम असेल.

(१३) **रजा प्रवास सवलत** :- श्री. के. एच. गोविंदराज (भा.प्र.से.) यांना अखिल भारतीय सेवा (रजा प्रवास सवलत) नियम, १९७५ मधील तरतुदीनुसार रजा प्रवास सवलत मिळण्याचा हक्क असेल. याबाबतचा खर्च सिकॉम लि. या संस्थेस सोसावा लागेल.त्यांना प्रतिनयुक्तीच्या कालावधतीत नैमित्तिक रजा वगळता इतर रजा कालावधीतील रजा प्रवास सवलत मंजूर करण्यास शासन (सामान्य प्रशासन विभाग/ कार्यासन-१०) सक्षम असेल. (शासन परिपत्रक साप्रवि भाप्रसे-२१०५/७४/२००५/९ दिनांक ६/१२/२००५) तसेच नैमित्तीक रजेच्या कालावधीतील रजा प्रवास सवलत मंजूर करण्यास उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई सक्षम असेल.

(१४) **वैद्यकीय सवलती** :- श्री. के. एच. गोविंदराज (भा.प्र.से.) यांना अखिल भारतीय सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम, १९५४ मधील तरतुदीनुसार वैद्यकीय सुविधाचा लाभ अनुज्ञेय असेल. याबाबतचा खर्च सिकॉम लि. मुंबई या संस्थेस सोसावा लागेल. मात्र, सदर संस्थेचे त्यांच्या कर्मचाऱ्यांसाठी वैद्यकीय सवलती देण्याबाबत वेगळे नियम असतील आणि त्याचा लाभ ते घेऊ इच्छित असतील तर

प्रतिनियुक्ती कालावधीत त्या नियमांचा लाभ घेण्याबाबत विकल्प देण्याचे स्वातंत्र्य त्यांना असेल. (शा.नि.सा.आ.वि.२००५/९/१/आ.३,दिनांक १९/३/२००५ व शा.नि.सा.आ.वि.२०११/३३३/११/ राकावि-२, दिनांक १६/११/२०११)

(१५) **<u>भविष्यनिर्वाह निधी</u>** :- श्री. के. एच. गोविंदराज (भा.प्र.से.) यांनी प्रतिनियुक्तीच्या कालावधीत अखिल भारतीय सेवा (भविष्य निर्वाह निधी) नियम, १९५५ मधील तरतदीनुसार, भविष्य निर्वाह निधीची वार्षिक वर्गणी दरमहा त्यांच्या वेतनातून भरणे आवश्यक आहे. ही वर्गणी ८००९-राज्य भविष्य निर्वाह निधी ०१- नागरी-१०४ अखिल भारतीय सेवा भविष्य निर्वाह निधी (८००९- ५०३-९) या लेखाशीर्षाखाली जमा दर्शविण्यात यावी. सदर रकमेचा धनादेश त्यांचे भविष्य निर्वाह निधी खाते महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), एक/दोन, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर यापैकी ज्या महालेखापालांकडे असेल त्या महालेखापालांच्या नावे काढून भविष्य निर्वाह निधी अनुसूचीसह त्यांच्याकडे पाठविण्यात यावा.

प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्यांना त्यांच्या भविष्य निर्वाह निधी खात्यातून परतावा/प्राप्त/ ना-परतावा अग्रिम मंजूर करण्यास शासन (सामान्य प्रशासन विभाग) सक्षम असल्यामुळे याबाबतचे अर्ज सामान्य प्रशासन विभाग/का. ९, मंत्रालय, मुंबई यांच्याकडे मंजूरीसाठी पाठविण्यात यावेत.

(१६) **<u>विभागीय चौकशी</u>** :- श्री. के. एच. गोविंदराज (भा.प्र.से.) यांच्या विरुध्द विभागीय चौकशीबाबत, अखिल भारतीय सेवा (शिस्त व अपिल), नियम १९६९ हे नियम लागू असतील. प्रतिनियुक्तीवर असतांना त्यांच्याविरुध्द विभागीय चौकशी असेल तर त्यांना शासन सेवेत प्रत्यावर्तित करण्यात येईल. या संबंधित कार्यवाही अंतर्गत त्यांना निलंबित केल्यास निलंबनाधीन कालावधीत त्यांना शासन निर्वाह भत्ता देण्यात येईल, मात्र निर्वाह भत्याची रक्कम सिकॉम लि. यांच्याकडून वसूल करण्यात येईल.

(१७) **<u>बोनस किंवा सानुग्रह अनुदान</u>** :- श्री. के. एच. गोविंदराज (भा.प्र.से.) यांना बोनस किंवा सानुग्रह अनुदान अनुज्ञेय नाही. सिकॉम लि. च्या नियमानुसार जरी त्यांना बोनस अथवा सानुग्रह अनुदान अनुज्ञेय असेल तरी ते त्यांना स्विकारता येणार नाही.

(१८) **<u>गट विमा योजना</u>** :- श्री. के. एच. गोविंदराज (भा.प्र.से.) यांच्या वेतनातून दरमहा रु. १२०/- इतकी रक्कम राज्य/केंद्र शासकीय कर्मचारी गट विमा योजनेच्या वर्गणीपोटी सिकॉम लि. दरमहा वसूल करील आणि ही रक्कम धनादेशाव्दारे महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), एक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्याकडे पाठविल. ही रक्कम ८६५८-८६२-८ या लेखाशिर्षाखाली जमा दर्शविण्यात यावी.

(अ) (केंद्र शासकीय कर्मचारी गट विमा सदस्यांबाबत)

८६५८- सस्पेन्स अकाऊंटस-१२३- ऑल इंडिया सर्व्हिसेल ऑफिसर्स
ग्रुप इन्शुरन्स स्कीम - रिकव्हीज टी वर्डस,
सेंट्रल गव्हर्नमेंट एम्प्लॉईज ग्रुप इन्शुरन्स स्कीम मेड ॲप्लीकेबल द एआयएस ऑफिसर्स जॉइंट ऑन दि महाराष्ट्र केडर सबस्क्रिप्शन आयएएस (८६५८-८६२-८)

सदर वर्गणी भरण्यास विलंब करण्यात आल्यास विलंब कालावधीत दंडनीय दराने व्याज आकारण्यात येईल.

(१९) <u>**मोटार कार**</u> :- श्री. के. एच. गोविंदराज (भा.प्र.से.) यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालावधीत वापरासाठी सिकॉम लि. ही संस्था वाहन उपलब्ध करुन त्यांना देईल. सदर वाहनांचा खाजगी वापर पुढील अटीच्या अधीनतेने त्यांना करता येईल.

(अ) वाहनाचा खाजगी वापर दरमहा २५० किलोमीटरहून अधिक होता कामा नये. यासाठी त्यांनी वेळोवेळी विहित करण्यात येणा-या दराने भाडे सिकॉम लि. या संस्थेस द्यावे लागेल.

(ब) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक- बीआरए-१०९०/सीआर-३२०/९०/एसईआर-५, दिनांक १७/१२/१९९० अन्वये निर्गमित केलेल्या आदेशानुसार वाहनाच्या खाजगी वापरास परवनगी असेल. मात्र संबंधित आदेशास वेळोवेळी ज्या सुधारणा केल्या जातील त्या सुधारणा ही वाहनाच्या खाजगी वापराबाबत आपोआप लागू असतील.

(२०) <u>**अग्रिम**</u>:- श्री. के. एच. गोविंदराज (भा.प्र.से.) यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत, भविष्य निर्वाह निधी परतावा/प्राप्त /ना-परतावा अग्रिम, घरबांधणी अग्रिम, मोटार कार अग्रिम, वैयक्तिक संगणक अग्रिम मंजूर करण्याकरीता शासन सा. प्र.वि. / सक्षम असेल, याबाबतचे त्यांचे अर्ज सामान्य प्रशासन विभाग/ का.९ मंत्रालय, मुंबई यांच्याकडे मंजूरीसाठी पाठविण्यात यावे. सिकॉम लि. या संस्थेने त्यांना सादर अग्रिम मंजूर करु नयेत.

(२१) <u>**प्रतिनियुक्तीवर असतांना रजेवरुन अथवा प्रशिक्षणावरुन परत आल्यानंतर नियुक्ती**</u>:- श्री. के. एच. गोविंदराज (भा.प्र.से.) हे प्रतिनियुक्तिच्या कालावधीत रजेवर गेल्यास किंवा प्रशिक्षणासाठी गेल्यास आणि ते धारण करीत असलेल्या पदावर अन्य अधिका-याची नियुक्ती करण्यात आली आणि रजेवर अथवा प्रशिक्षणावरुन परत आल्यानंतर त्यांची नियुक्ती अन्य पदावर करण्यात आली तर रजावेतन, वेतन, पदग्रहण अवधी सक्तीचा खोळंबा कालावधी इत्यादीबाबत सर्व खर्च, रजा समाप्तीच्या अथवा प्रशिक्षण समाप्तीच्या दिनांकापासून ते अन्य पदाचा कार्यभार धारण करीपर्यंतच्या दिनांकापर्यंत सिकॉम लि. ही संस्था सोसेल.

(२२) <u>**निवासी शिपायाऐवजी रोख भत्ता**</u> :- सिकॉम लि. या संस्थेत प्रतिनियुक्तीच्या कालावधीत श्री. के. एच. गोविंदराज (भा.प्र.से.) यांच्या निवासस्थानी शिपाई दिला नसल्यास व के. एच. गोविंदराज (भा.प्र.से.) यांना प्रतिनियुक्तीवर जाण्यापुर्वी निवासी शिपायाऐवजी रोखभत्ता अनुज्ञेय असल्यास किंवा सिकॉम लि. या संस्थेतील अधिका-यांना निवासी शिपायाऐवजी रोखभत्ता अनुज्ञेय असल्यास नियुक्तीच्या कालावधतीत त्याच दराने निवासी शिपायाऐवजी रोख भत्ता अनुज्ञेय असेल. मात्र असा भत्ता घेण्यापूर्वी दरमहा, अधिकाऱ्याचे निवासी शिपाई देण्यात आलेला नाही, असे प्रमाणपत्र संबंधित अधिका-याने देणे आवश्यक रहील.

(२३) <u>**शासनाने वेळोवेळी विहित केलेले नियम लागू करणे**</u> :- श्री. के. एच. गोविंदराज (भा.प्र.से.) यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत शासन वेळोवेळी जे नियम करील किंवा जे कार्यकारी आदेश निर्गमित करील ते नियम/कार्यकारी आदेश लागू असतील.

(२४) <u>**प्रतिनियुक्ती कालावधीत देशात/परदेशात प्रवास**</u> :- सिकॉम लि. या संस्थेमध्ये प्रतिनियुक्तीवर असताना, सदर संस्थेच्या कामासंबंधात देशात कोठेही प्रवास करावयाचा झाल्यास शासनाच्या पूर्व

परवानगीची आवश्यकता असणार नाही. मात्र, संस्थेच्या कामाच्या संबंधात परदेशी जावयाचे असल्यास, शासनाची पूर्वपरवानगी आवश्यक असेल. त्याचप्रमाणे सिकॉम लि. या संस्थेशी प्रत्यक्ष संबंध नसलेल्या शासकीय, निमशासकीय कामानिमित्त अथवा खाजगी संस्थांच्या समारंभासाठी देशांतर्गत प्रवास करावयाचा असल्यास त्यासाठी शासनाची पूर्व परवानगी घेणे आवश्यक राहील.

(२५) **विहित अटी शर्तीमध्ये समाविष्ट नसलेल्या अटी/शर्तीबाबत** :- वर नमूद केलेल्या अटी/शर्तीमध्ये समाविष्ट नसलेल्या अटी/शर्तीबाबत महाराष्ट्र शासन संवर्गातील भारतीय प्रशासन सेवा अधिका-यांना जे नियम, विनियम आणि कार्यकारी आदेश लागू असतील ते नियम, विनियम व कार्यवाही आदेश लागू असतील.

२. हे आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने त्यांच्याकडील अनौपचारीक संदर्भ क्रमांक ४३/२००१७/९, दिनांक २५/०७/२०१७ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१७०८०४१५४१३५७८१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Shankarrao Ingle

Digitally signed by Sanjay Shankarrao Ingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f0d616600e4d2f510d1c8cc19813e070ad282d2275bf6fc132a2dee97f14e0a6, serialNumber=d337930b14433dc62c0154af2bbc60bb5a6edcaa66b7f34596c50a27eb0f6333, cn=Sanjay Shankarrao Ingle
Date: 2017.08.04 15:32:49 +05'30'

**( संजय इंगळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) व्यवस्थापकीय संचालक, सिकॉम लि. मुंबई
२) श्री. के. एच. गोविंदराज (भा.प्र.से.), व्यवस्थापकीय संचालक, सिकॉम लि, मुंबई
३) महालेखापाल (लेखा परीक्षा व लेखा अनुज्ञेयता) १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४) महालेखापाल (लेखा परीक्षा व लेखा अनुज्ञेयता) २, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६) निवासी लेखा अधिकारी, मुंबई
७) सामान्य प्रशासन विभाग कार्यासन ९/ ९ अ/१०, मंत्रालय, मुंबई ३२
८) वित्त विभाग, कार्यासन सेवा २/३, मंत्रालय, मुंबई ३२
९) निवड नस्ती.